# प्रस्तावना

दरवर्षी प्रमाणे या वर्षी आपली वारी आळंदीपासून ते पंढरपूरपर्यंत व्यवस्थित पार पडली, कारण हे सर्व करून घेणारा 'तो' आहे.

हे सर्व अभंग मी शोधतो म्हणण्यापेक्षा माझ्याकडून हे अभंग निवडून घेतले जातात. या प्रक्रियेमध्ये १५०-२०० अभंगांच वाचन सहज होऊन जाते. इतके अभंग वाचले जाणे हा मात्र माझा स्वार्थ.

या दिंडीमध्ये मला अनेकांचे साह्य होते. रवी ढेंबरे यांनी दिंडीचे पान आकर्षक करण्यात मोलाचे साह्य केले आहे. तसेच पुस्तकाचे मुखपृष्ठही त्यांनी तयार केले आहे. अभंग व विवेचनाचे पहिले वाचक म्हणजे माझे बंधू केदार जोशी व पत्नी मेधा जोशी. त्यांनी सुचविलेल्या बदलामुळे कमीतकमी त्रुटींसह अभंग आपल्यापर्यंत पोहचतो.

या वेळेस उर्मिलाताई इंगळे, सातारा (वय वर्ष ८२ फक्त)[भ्रमणध्वनी - 9028815585] या माउली दिंडीत सामील झाल्या. त्यांनी अभंगाला चाली लावून आपल्या गानसेवेतून आम्हा सर्व वारकऱ्यांना वेगळाच आनंद दिला. यातील सर्वच अभंगांना चाल लावणे सोपे नव्हते. पण ज्याप्रमाणे उर्मिलामाउली म्हणतात, "चाल 'महाराज' लावून देतात. म्हणूनच हे शक्य झाले आहे."; व ते शतशः खरं आहे. हे ध्वनिमुद्रण स्मार्ट फोनवर केले आहे. त्यांनी गायलेले अभंग या पुस्तकाबरोबर दिले आहेत. प्रत्येक पानावरील हे बटन दाबून आपण अभंग ऐकू शकता. मला वैयक्तिक पातळीवर त्यांचा भाव जास्त भावला.

आपल्याला ही वारी कशी वाटली हे नक्कीच कळवा, तसेच यामध्ये काही सुधारणा हव्या असतील तर त्या ही कळवा.

कल्याण

kalyan.joshi@gmail.com

9423260836

पुणे

तिथीः आषाढ शु. एकदशी १९४५, शिवशक ३५०

# अनुक्रमणिका

| दिवस | संत | अभंग प्रकार | प्रस्थान | मुक्काम |
|---|---|---|---|---|
| १ | ज्ञानेश्वर | मोक्षतुच्छतापर | आळंदी | आजोळघर आळंदी |
| २ | चोखामेळा | नामपर | आळंदी | पुणे |
| ३ | कान्होपात्रा | करुणापर | | पुणे |
| ४ | तुकाराम | मागणीपर | पुणे | सासवड |
| ५ | जनाबाई | भक्तवत्सलता | | सासवड |
| ६ | सेनामहाराज | भेटीपर | सासवड | जेजुरी |
| ७ | नामदेव | सलगीपर | जेजुरी | वाल्हे |
| ८ | निळोबा | प्रेमकलहपर | वाल्हे | लोणंद |
| ९ | नरहरीमहाराज | पंढरीपर | | लोणंद |
| १० | एकनाथ | उपदेशपर | लोणंद | तरडगाव |
| ११ | जनार्दन स्वामी | सद्गुरूपर | तरडगाव | फलटण |
| १२ | मुक्ताबाई | संतपर | फलटण | बरड |
| १३ | नामदेव | वैष्णवपर | बरड | नातेपुते |
| १४ | निळोबा | स्थितीपर | नातेपुते | माळशिरस |
| १५ | ज्ञानेश्वर | विरहिणी | माळशिरस | वेळापूर |
| १६ | तुकाराम | धावा | वेळापुर | भंडीशेगाव |
| १७ | चोखामेळा | विठ्ठलपर | भंडीशेगाव | वाखरी |
| १८ | एकनाथ | गौळण | वाखरी | पंढरपूर |
| १९ | ज्ञानेश्वर | अध्याय समाप्तीपर | नगर प्रदक्षिणा | |

॥ अभंग दिंडी ॥



## दिवस १ - मंदिरातून प्रस्थान
## संत ज्ञानेश्वर महाराज

मोक्ष मेल्यापाठी आम्हांसी होईल। ऐसे जे म्हणतील अतिमूर्ख ॥१॥
दीप गेल्यावरी कैचा जी प्रकाश। झांका झांकी त्यास कासयाची ॥२॥
जंववरी देह आहे तंववरी साधन। करुनिया ज्ञान सिध्द करा ॥३॥
गृह दग्ध न होतां शिंपीजे उदक। शेखी तो निष्टंक काय कीजे ॥४॥
आहे मी हा कोण करावा विचार। म्हणे ज्ञानेश्वर निवृत्तीचा ॥५॥

1. शेखी-प्रौढी; बढाई 2. निष्टंकः निःसंशय; निश्चित

माऊलींचा हा मोक्षतुच्छतापर अभंग. मेल्यावर मोक्ष मिळतो हे म्हणणे मुर्खपणाचे आहे. दिवा विझल्यावर कसला प्रकाश? जोपर्यंत देह आहे तोपर्यंत ज्ञान घ्या व मोक्ष मिळवा. घर जळालेलं नसताना त्यावर पाणी टाकण्यात काय अर्थ. 'मी कोण आहे?' याचा विचार प्रत्येकाने करावा. इतके स्पष्ट व परखड विचार आजही पचवायला जड आहे.

# ॥ अभंग दिंडी ॥



## दिवस २ - आळंदी प्रस्थान- मुक्काम पुणे
## संत चोखामेळा महाराज

**योग याग तप व्रत आणि दान । करिता साधन नाना कष्ट ॥१॥**
**सुलभ सोपे रे नाम विठोबाचे । सकळ साधनांचे मूळ बीज ॥२॥**
**येणे भवव्यथा तुटेल जीवाची । प्रतिज्ञा संतांची हीच असे ॥३॥**
**म्हणोनि नामाचा करा गदारोळा । म्हणे चोखामेळा विठ्ठल वाचे ॥४॥**

संत चोखामेळा यांचा हा नामपर अभंग. नामाचे महत्व महाराज या अभंगातून पटवून देत आहेत. योग, याग अशा साधनांमध्ये खूप कष्ट आहेत पण नामसाधनेत कष्ट कमी आहेत. नामस्मरणाने तुमच्या व्यथा संपतील असे संतवचन आहे. 'गदारोळ' हा सहसा नकारात्मक छटा असणारा शब्द महाराजांनी सकारात्मक पद्धतीने वापरला आहे.

# ॥ अभंग दिंडी ॥



## दिवस ३ - पुणे मुक्काम
## संत कान्होपात्रा महाराज

दीन पतित अन्यायी । शरण आले विठाबाई ।। १ ।।
मी तो आहे यातीहीन । न कळे काही आचरण ।। २ ।।
मज अधिकार नाही । शरण आले विठाबाई ।। ३ ।।
ठाव देई चरणापाशी । तुझी कान्होपात्रा दासी ।। ४ ।।

संत कान्होपात्रा यांचा हा करुणापर अभंग. कान्होपात्रांच्या अभंगांची संख्या खूप कमी आहे, पण जे आहेत ते सर्वच करुणरसानी भरलेले आहेत. मी दीन पतीत आहे. मला चांगल आचरण करता येत नाही पण मी तुला शरण आले आहे. माझा अव्हेर करू नकोस. विठाबाई हा स्त्रीलिंगी शब्द वापरून देवाशी वेगळीच जवळीक साधली आहे.

॥ अभंग दिंडी ॥



## दिवस ४ - पुणे प्रस्थान- मुक्काम सासवड
## संत तुकाराम महाराज

लाज वाटे पुढे तोंड दाखविता । परि जाऊ आता कोणापाशी ॥१॥
चुकलिया कामा मागतो मुशारा । लाज फजितखोरा नाही मज ॥२॥
पाय सांडूनिया फिरतो बासर । स्वामिसेवे चोर होऊनिया ॥३॥
तुका म्हणे मज पाहिजे दंडिले । पुढे हे घडले न पाहिजे ॥४॥

1) मुशारा- पगार, मजुरी 2) बासर- भटक्या, स्वच्छंदी

जगद्‌गुरूंचा हा मागणीपर अभंग. लाज वाटती आहे पण तुम्हाला तोंड दाखवल्याशिवाय पर्याय नाही. चुकीच्या कामाची मी मजुरी मागतो आहे. तुमची सेवा सोडून मी भटकत राहिलो आहे. तुम्ही दंड द्या असे परत होणार नाही.

महाराजांनी मुशारा हा अरेबिक शब्द चपखलपणे योजला आहे.

# ॥ अभंग दिंडी ॥



## दिवस ५ - मुक्काम सासवड
## संत जनाबाई महाराज

निवृत्ति पुसत । कोठे होते पंढरिनाथ ॥१॥
खूण कळली हृषीकेशी। सांगो नको निवृत्तीसी ॥२॥
उत्तर दिले ज्ञानदेवे । नवल केवढे सांगावे ॥३॥
शिव वंदी पायवणी । नये योगियांचे ध्यानी ॥४॥
द्वारी उभे ब्रह्मादिक । गुण गाती सकळिक ॥५॥
जनीसवे दळी देव । तिचा देखोनिया भाव ॥६॥

1)पायवणी -पाय धुऊन ते तीर्थ घेणे

जनाबाईंचा हा भक्तवत्सलतेवरचा अभंग.  निवृत्तिनाथ देवाला विचारतात "कुठे होता?" याच उत्तर माउली देतात.  "ज्यांच्या पायाच तीर्थ देव घेतात, योगी ज्यांचे ध्यान करतात, सर्व लोक ज्याचे गुण गान करतात तो जनाबाईंकडे दळण दळतो. कारण जनाबाईंचा भाव." योगीजनांना जे साध्य होत नाही ते भक्तीमुळे सहज साध्य होते.

# ॥ अभंग दिंडी ॥



## दिवस ६ - सासवड प्रस्थान- मुक्काम जेजुरी
## संत सेनामहाराज

चित्त नाही हाती । करू जाता हरिभक्ति ॥ १ ॥
मज इतुकी वासना। भेटी द्यावी नारायणा ॥ २ ॥
कोण जाणे दानधर्म । नव्हे स्वतंत्र कैचे कर्म ॥ ३ ॥
सेना म्हणे सांग मात। जेणे माझे होय हित ॥ ४ ॥

1) मात- भाषा, वर्णन, गोष्ट

सेनामहाराजांचा हा भेटीपर अभंग. हरी भक्ती करायला जावे तर; तिथे चित्त लागत नाही. तुमची एकदा भेट व्हावी; ही एकच इच्छा आहे. मला दानधर्म कळत नाही. देवा मला असं काही तरी सांग की ज्यामध्ये माझे हित असेल व आपले दर्शन ही घडेल. "इतुकी" शब्दाचा परिणामकारक वापर महाराज करतात.




## दिवस ७ - जेजुरी प्रस्थान- मुक्काम वाल्हे
## संत नामदेव महाराज

उलिसा प्रपंच हा लटका । तेणे तूज व्यापका झांकियले ॥१॥
तैसियाच्या मज घालोनिया खेवा । स्वामीद्रोही देवा करिसी कैसा ॥२॥
मेरुचिया गळा बांधोनि मशक । पाहसी कवतुक अनाथनाथा ॥३॥
नामा म्हणे देवा कळली तुझी माव । माझा मी उपाव करीन आता ॥४॥

1) खेवा - बेडी 2) मशक - माशी, चिलट 3) माव - लबाडी

नामदेव महाराजांचा हा सलगीपर अभंग. हा छोटासा लटका प्रपंच पण त्याने विश्वव्यापकाला झाकले आहे. अशा प्रपंचाची बेडी माझ्या पायात अडकून ठेवली आहेस. मोठ्या पर्वताला चिलट बांधल्याप्रमाणे आमची अवस्था आहे. तू आमची मजा बघत बसला आहेस. "यातून कसे सुटायचे?" याच उत्तर मलाच शोधावे लागणार आहे.

# ।। अभंग दिंडी ।।



## दिवस ८ - वाल्हे प्रस्थान- मुक्काम लोणंद
## संत निळोबा महाराज

आणिकासी सांगे आशेचे बंधन ।सदाचा बराडी असोनी आपण ।।१।।
काय म्हणावे यावरि आता । नष्टाचा परम नष्ट हाचि हा पहाता ।।२।।
भक्ताच्या हाताची पाहातसे वास। काही देतील म्हणउनी टोकतचि बैसे।।३।।
जळ फळ पुष्प देता काहीचि न सोडी।देऊ जाताचि घाली हा तोंडी।।४।।
आशेचा बांधला देव हा कैसा । काय निवारील आमुची आशा ।।५।।
भक्त नदिती तै उपवासीचि बैसे ।काय खाईल जवळी काहीचि या नसे ।।६।।
निळा म्हणे हा अनाथ बापुडा। जाणती संत परि न बोलती भीडा।।७।।

1) बराडी- अधाशी 2) टोकतचि- टक लावून पहाणे 3) भीडा - भीडस्त

निळोबारायांचा हा प्रेमकलहपर अभंग. ज्यांच्यावर प्रेम असते त्यांच्याशी आपण भांडतो. अभंगातील शेवटची ओळ फारच छान आहे. तुझे "गुण" संतांना माहीत आहेत पण त्यांच्या भिडस्त स्वभावामुळे ते सांगत नाहीत.

॥ अभंग दिंडी ॥



## दिवस ९ - मुक्काम लोणंद
## संत नरहरी महाराज

पंढरपुरचा जाणा विठ्ठलधणी । राणी रुक्मिणी सत्यभामा ॥ १ ॥
भूमीमध्ये गुप्त कानोपात्रा झाली । उजवे बाजू ठेली लक्ष्मी ते ॥ २ ॥
पुढे हो प्रतिमा नामदेव पायरी । उभा महाद्वारी चोखामेळा ॥ ३ ॥
पुढे मल्लिकार्जुन महिमा असे फार । लिंग असे थोर महादेवाचे ॥ ४ ॥
पुढे भागीरथी मध्ये पुंडलिक । आणिकही तेथे वेणुनाद ॥ ५ ॥
आषाढी कार्तिकी साधुसंत येती । गोपाळकाला करिती आनंदाने ॥ ६ ॥
देवाचे समोर नरहरी सोनार । ह्रदयी निरंतर नाव घेतो ॥ ७ ॥

नरहरी महाराजांचा हा पंढरीपर अभंग. महाराजांची भाषा अतिशय सोपी, सुलभ असल्याने विवेचनाची गरज नाही.

॥ अभंग दिंडी ॥



## दिवस १० - लोणंद प्रस्थान- मुक्काम तरडगाव
## संत एकनाथ महाराज

पक्षी अंगणी उतरती । ते का गुंतोनी राहती ॥ १ ॥
तैसे असावे संसारी । जोवरी प्राचीनाची दोरी ॥ २ ॥
वस्तीकर वस्ती आला । प्रातःकाळी उठोनी गेला ॥ ३ ॥
एकाजनार्दनी शरण । ऐसे असता भय कवण ॥ ४ ॥

1) प्राचीनाची दोरी-प्रारब्धकर्म

नाथमहाराजांचा हा उपदेशपर अभंग. पक्षी दाण्यांसाठी अंगणात येतात व ते दाणे टिपून उडून जातात. वाटसरू रात्रीच्या मुक्कामासाठी राहतो व सकाळी पुढे मार्गक्रमण करतो. अशा प्रकारे संसार करून पुढे मार्गक्रमण करत राहावे असा उपदेश महाराज करतात.

# ॥ अभंग दिंडी ॥



## दिवस ११ - तरडगाव प्रस्थान- मुक्काम फलटण
## संत जनार्दनस्वामी

गुरुसख्या तुजविण । जाऊ पाहे माझा प्राण ॥
का हो कठिण केले मन । पाहे नेत्र उघडून ॥
माता पिता म्हणविले । तरी का निर्वाण मांडिले ॥
आता यावे लवकरी । भेट द्यावी बा सत्वरी ॥
यश घेई गुरुराया। जनार्दनि ठेवी पाया ॥

जनार्दनस्वामींचा हा सद्गुरूपर अभंग. विवेचनाची गरज नसलेला भावोत्कट असा हा स्वामींचा अभंग.

॥ अभंग दिंडी ॥



## दिवस १२ - फलटण प्रस्थान- मुक्काम बरड
## संत मुक्ताबाई महाराज

ब्रह्म जैसे तैशा परी। आम्हा वेटीले भूते चारी॥
हात आपला आपणां लागे। त्याला भरु नये रागे॥
जीभ दातांनी चाविली। कोणे बत्तीशी तोडीली?॥
थोडे दुखावले मन। पुढे उदंड साहाणे॥
चणे खावे लोखंडाचे। मग ब्रह्मपदी नाचे॥
मन मारुनी उन्मन करा। ताटी उघडा ज्ञानेश्वरा॥

हा अभंग वेगळ्या पद्धतीने ही लिहला जातो.

मुक्ताबाईंचा हा संतपर अभंग. ताटीच्या अभंगातून मुक्ताबाईंनी संताचे गुण सांगितलेले आहेत. आपल्या ब्रह्मज्ञानी दादाला मुक्ताबाई ताटीच्या अभंगातून उपदेश देत आहेत.

आपलाच हात आपल्याला लागेल का? जीभ चावली गेली म्हणून कुणी दात पाडेल का? आपले मन दुखावले गेले आहे; पण त्यांच्यावर राग धरून संपूर्ण समाजाचे नुकसान कशासाठी?

आपण आपल्या ज्ञानाचे दार उघडून समाजाचे कल्याण करा.

# ।। अभंग दिंडी ।।



## दिवस १३ - बरड प्रस्थान- मुक्काम नातेपुते
## संत नामदेव महाराज

वैष्णवांचे घरी मांडिला पाहुणचार । नामाचा वोगर वाढियेला ।। १ ।।
घ्यारे ताटभरी जेवा पोटभरी । आनंद गजरी रामनाम ।। २ ।।
होईल पायरव दुर्जना न सांगावे । एकांती सेवावे नामा म्हणे ।। ३ ।।

1) वोगर -वाढलेले अन्न, मूद, वाढप

महाराजांचा हा वैष्णवपर अभंग. वैष्णवांच्या घराचे वर्णन महाराज करत आहेत. वैष्णवांच्या घरी नामस्मरणाचे अन्न वाढलेले असते. जितके पाहिजे तितके घ्या पोटभर जेवा. नामस्मरणाचे प्रदर्शन न मांडता नामस्मरण अविरत करत राहावे असे महाराज सांगत आहेत.

॥ अभंग दिंडी ॥



## दिवस १४ - नातेपुते प्रस्थान- मुक्काम माळशिरस
## संत निळोबा महाराज

मागे उदंड साधने केली । उत्तीर्णी ते झाली कर्मफिळे ॥
परी तुमचे नेदितीच प्रेम । वाढविती श्रम संसारीचा॥
जया नाही मार्गची ठावा । काय ते गावा पाविती॥
निळा म्हणे काटवणी घालिती घालणी जाणीवेच्या॥

1) काटवणी - अतिशय गढूळ पाणी 2) घालणी - छापा; हल्ला

निळोबा महाराजांचा हा स्थितीपर अभंग. मी मागे (पुर्वजन्मी) बरीच साधना केली असणार म्हणून मला ही कर्मगती प्राप्त झाली आहे. पण या कर्मामुळे तुझ्यावरचे प्रेम वाढत नाही; तर संसारातील श्रम वाढत आहेत. ज्याला रस्ताच माहीत नाही तो काय इच्छित स्थळी पोहचणार? माझ्या संसारीक जाणीवांमुळेच (विचारांनी) मला अशुद्ध करून टाकलेले आहे. अशी आपल्या मनाची स्थितीच महाराज अभंगातून सांगत आहेत.

# ।। अभंग दिंडी ।।



## दिवस १५ - माळशिरस प्रस्थान- मुक्काम वेळापूर
## संत ज्ञानेश्वर महाराज

पडिले दूरदेशी मज आठवे मानसी ।
नको हा वियोग कष्ट होताती जिवासि ।।१।।
दिनु तैसी रजनी मज जाली गे माये ।
अवस्था लावुनि गेला अजुनी का न ये ।।२।।
गरुडवाहना, गंभीरा येई गा दातारा ।
बाप रखुमादेविवरा श्रीविठ्ठला ।।३।।

माउलींची ही विरहिणी. आपली प्रिय व्यक्ती आपल्या जवळ नसल्याने तिला झालेले दुःख माउली विरहिणीतून दाखवतात. दुर देशात मी आहे; आपले मिलन मला आठवत आहे. आता हा वियोग सहन होत नाही. मला दिवस व रात्र एक सारखेच झाले आहेत, मला शांत झोप येत नाही. तो अजून का येत नाही? देवा आता तरी मला दर्शन दे. माउलींची ही विरहिणी म्हणजे भक्ताने देवाशी केलेला संवाद.

# ॥ अभंग दिंडी ॥



## दिवस १६ - वेळापूर प्रस्थान- मुक्काम भंडीशेगाव
## संत तुकाराम महाराज

सिंचन करिता मूळ । वृक्ष ओलावे सकळ ।।१।।
नको पृथकाचे भरी । पडो एक मूळ धरी ।।धृ।।
पाण चो-याचे द्वार । वरिल दाटावे ते थोर ।।२।।
वश जाला राजा । मग आपुल्या त्या प्रजा ।।३।।
एक चिंतामणी । फिटे सर्व सुखधणी ।।४।।
तुका म्हणे धावा । आहे पंढरी विसांवा ।५।।

पंढरीच्या वाटेवर तोंडले बोंडले – टप्पा या ठिकाणी माऊलींच्या व तुकोबांच्या पालखी सोहळ्याचा धावा होतो. धावा म्हणजेच धावणे.

महाराजांचा हा धाव्याचा अभंग. झाडाच्या मुळाशी पाणी दिल की ते संपूर्ण झाडापर्यंत पोहचते. जर राजाच वश झाला तर प्रजा आपोआपच वश होते. चिंतामणी जवळ असेल तर सर्व इच्छा पूर्ण होतात.त्यामुळे वर्गीकरण करण्यापेक्षा मुळावरच (म्हणजेच भक्तीमार्गावर) लक्ष केंद्रित करा.भक्तीमार्गाला गळती लागायचे ठिकाण म्हणजे तोंड, ते आता बंद करा व "धावा" कारण आता पंढरपूरच विसावा आहे.

# ॥ अभंग दिंडी ॥



## दिवस १७ - भंडीशेगाव प्रस्थान- मुक्काम वाखरी
## संत चोखामेळा महाराज

बहु मत ग्रंथ, करिता पठण। सुख समाधान, नव्हे तेणे।।
वेदशास्त्र पुराण, करिता श्रवण। सुख समाधान, नव्हे तेणे।।
अष्टांग साधन, करिता जप यज्ञ। सुख समाधान, नव्हे तेणे।।
चोखा म्हणे सुख समाधान वृत्ती। पाहता विठ्ठल मूर्ती, विटेवरी।।

चोखामेळा महाराजांचा हा विठ्ठलपर अभंग. महाराज समाधान कशात नाही हे प्रथम सांगतात. विठ्ठल मूर्ती बघून मिळणारे सुख समाधान हे वेगवेगळ्या साधना मार्गांतून मिळणाऱ्या समाधानापेक्षा जास्त आहे; असे महाराज म्हणतात

# ॥ अभंग दिंडी ॥



## दिवस १८ -वाखरी प्रस्थान- मुक्काम पंढरपूर
## संत एकनाथ महाराज

भुलविले वेणुनादे ।
वेणू वाजविला गोविंदे ॥ धृ ॥
पंगुळले यमुनाजळ।
पक्षी राहिले निष्फळ ॥ १ ॥
तृणचारे लुब्ध जाली।
पुच्छे वाहोनियां ठेली ॥ २ ॥
नाद न समाये त्रिभुवनी ।
एका भुलला जनार्दनी ॥ ३ ॥

नाथ महाराजांची ही गौळण. एक वेणूचा नाद आणि ती वाजवणारा प्रत्यक्ष गोविंद. त्यामुळे सृष्टीवर काय काय परिणाम झाला हे महाराज सांगत आहेत. यमुनेच पाणी पेंगुळले. पक्षी शांत झाले. सर्व जनावरे लुब्ध झाली. तो नाद या त्रिभुवनात समावू शकत नाही.

# ॥ अभंग दिंडी ॥



## दिवस १९ - आषाढी एकादशी पंढरपूर
## संत ज्ञानेश्वर महाराज

जरी मंत्रेचि वैरी मरे ।
तरी वायांचि कां बांधावी कटारे ।
रोग जाये दुधे साखरे । तरी निंब का पियावा ॥ २२३ ॥
तैसा मनाचा मारु न करितां ।
आणि इंद्रिया दुःख न देतां ।
एथ मोक्षु असे आयता । श्रवणाचिमाजी ॥ २२४ ॥

ज्ञानेश्वरी अध्याय ४

माउलींचा अध्याय समाप्तीपर ओवी. जर मंत्राने शत्रूचा नाश करता येत असेल तर कट्यार कशासाठी जवळ ठेवायची? जर दुध साखरेने रोग बरा होणार असेल तर कडू लिंब कशासाठी घ्यायचा? तसेच मनाला न मारत, इंद्रियांना त्रास न देता फक्त श्रवणातून मुक्ती मिळू शकते. म्हणून श्रोत्यांनी लक्षपूर्वक श्रवण भक्ती करावी.

गेले १९ दिवस मी आपल्यापर्यंत वेगवेगळ्या संतांच्या (सद्गुरूंच्या) रचना पोहचवणाऱ्या पोस्टमनच (वाहकाच) काम केले. माझी ही सेवा तुम्ही गोड मानून घेतली म्हणून तुमचे आभार. पुढच्या वर्षी नक्की भेटू.

हेचि दान देगा देवा । तुझा विसर न व्हावा ।।

।। राम कृष्ण हरी ।।